राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळ, नवी दिल्ली यांना सन २०२०-२१ पर्यंतच्या कर्जाची परतफेड सन २०२१-२२ च्या मंजूर अनुदानातून करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : अर्थसं-१७२१/ प्र.क्र.२२/ टेक्स-१(ब)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १४ सप्टेंबर, २०२१

**संदर्भ** :- १) उप निदेशक (वित्त), रा.स.वि.म., नवी दिल्ली यांचे पत्र क्र. NCDC-A&C/ IX (१)/Rep/०९/१२६९, दि.४.६.२०२१.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. पूरक-२०२१/प्र.क्र.७८/ अर्थ-३, दि. २०.७.२०२१.
३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. २४.६.२०२१.
४) खर्चाचे पूरक विवरणपत्र, वित्त विभाग, दि. ५.७.२०२१.

**प्रस्तावना :-**

वस्त्रोद्योग विभागांतर्फे राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळ, नवी दिल्ली यांच्या विविध योजनांतर्गत राज्यातील विविध वस्त्रोद्योग घटकांना त्या त्या योजनेच्या मंजूर आकृतीबंधानुसार भागभांडवल / कर्ज / अनुदान स्वरुपात अर्थसहाय्य उपलब्ध करुन देण्यात येते. रा.स.वि.म. कडून राज्य शासनास उपलब्ध करुन देण्यात येणारा निधी हा राज्य शासनावर संपूर्णपणे कर्ज म्हणून गणला जातो. संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये रा.स.वि.म. ने राज्य शासनास मंजूर केलेल्या कर्जापैकी सन २०२०-२१ च्या देय हप्त्यापोटी परतफेडीकरीता पात्र ठरलेल्या कर्जातील मुद्दल रु. १,३६,१३,७००/-व व्याज रु.३२,३५,५७९/- अशा एकूण रु.१,६८,४९,२७९/- इतक्या रकमेची परतफेड करण्याबाबत कळविण्यात आले आहे. सदर पत्रात कळविल्यानुसार सदर रक्कम दि.२०.९.२०२१ पूर्वी भरल्यास व्याजाच्या रकमेत सूट मिळणार असून रु. ३२,३५,५७९ /- ऐवजी रु.३०,०३,६९२/- इतके व्याज भरावे लागेल. म्हणजेच दि.२०.९.२०२१ पूर्वी रक्कम भरल्यास शासनास रु. २,३१,८८७/- इतकी सूट मिळून एकूण रु.१,६६,१७,३९२/- इतकी रक्कम भरावी लागेल. त्याअनुषंगाने रु.१,६६,१७,३९२/- इतक्या रकमेपैकी मुद्दल रक्कम रु. १,३६,१३,०००/- इतकी रक्कम रा.स.वि.म., नवी दिल्ली यांना अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील विविध वस्त्रोद्योग घटकांना राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळ, नवी दिल्ली यांच्या विविध योजनांतर्गत राज्य शासनास कर्ज मंजूर करण्यात आले होते. सदर कर्जाची मुद्दल रु. १,३६,१३,०००/- (अक्षरी रु. एक कोटी छत्तीस लाख तेरा हजार फक्त) इतकी रक्कम सन २०२०-२१ पर्यंतच्या परतफेडीच्या हप्त्यापोटी राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळ, नवी दिल्ली यांना अदा करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूर देण्यात येत आहे.

२. वित्त विभाग, परिपत्रक क्र. अर्थसं २०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४.६.२०२१ मधील भाग-१ येथील अ.क्र.५) नुसार सदर अनिवार्य खर्च हा भारित खर्च असल्यामुळे त्यास खर्चाची मर्यादा लागू नाही. तसेच भाग-२ येथील अ.क्र.३) मध्ये नमूद केल्यानुसार या अनिवार्य खर्चाच्या वितरणास वित्त विभागाची मान्यता घेण्यात आली आहे.

३. कोषागारात देयके पारित करताना घ्यावयाची दक्षता या बाबतच्या वित्त विभागाच्या दि. १०.५.२०१६ च्या परिपत्रकाच्या अनुषंगाने सदर प्रस्तावासंबंधी माहिती खालीलप्रमाणे आहे -

१) विभागास प्रदान वित्तीय अधिकार - सदर खर्च हा ५६ - कर्जाची परतफेड व “४५- व्याज” या अनिवार्य खर्चात मोडतो.

२) मंजूर निधी :- सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात “रा.स.वि.म.कडून मिळालेली कर्जे (वस्त्रोद्योग) (अनिवार्य) (६००३ ०४६७)” या लेखाशीर्षाखाली रु.९५,७५,०००/- इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली असून सन २०२१ च्या पावसाळी अधिवेशनात उपरोक्त लेखाशीर्षांखाली अनुक्रमे रु.४०,३८,७००/- इतकी रक्कम पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध करुन देण्यात आली आहे.

३) मागील ३ महिन्यांपूर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५%किंवा अधिक निधी खर्च झाला आहे:- मागील ३ महिन्यांपूर्वी उपरोक्त लेखाशीर्षांतर्गत कोणताही खर्च झालेला नाही.

४) ज्या लेखाशीर्षाखाली अनुदान वितरीत करण्यांत येत आहे, त्या लेखाशीर्षांतर्गत १ वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही:- उपरोक्त लेखाशीर्षांतर्गत १ वर्षापूर्वीचे कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

सदर शासन निर्णयातील अ. क्र.५ ते १० येथील बाबी लागू नाहीत.

४. सदर खर्च खालील लेखाशीर्षासाठी सन २०२१-२२ मध्ये उपलब्ध असलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

१) **कर्ज:- रु. १,३६,१३,०००/-** (अक्षरी रु. एक कोटी छत्तीस लाख तेरा हजार फक्त)

मागणी क्र. व्ही -४,
६००३, राज्य शासनाचे देशांतर्गत ऋण,
(००) १०८ - राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळाकडून मिळालेली कर्जे
(००)(०३) राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळाकडून मिळालेली कर्जे
(वस्त्रोद्योग)(अनिवार्य) भारित,
५६- कर्जाची परतफेड (६००३ ०४६७)

५. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेली एकूण रक्कम रु. १,३६,१३,०००/- (अक्षरी रु.एक कोटी छत्तीस लाख तेरा हजार फक्त ) इतकी रक्कम राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळ, नवी दिल्ली (NATIONAL COOPERATIVE DEVELOPMENT CORPORATION, NEW DELHI) या नावाने अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून आहरीत करुन राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळाच्या स्टेट बँक ऑफ इंडिया, व्यावसायिक शाखा, नेहरु प्लेस, नवी दिल्ली, चालू खाते क्र.३२१६४०५२८७४ मध्ये RTGS द्वारे वितरीत करण्याची कार्यवाही करण्याकरीता श्रीमती शि. दि. गायकवाड, कार्यासन अधिकारी (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२ यांना “आहरण व संवितरण अधिकारी”म्हणून तसेच श्री. स. दि. खरात, उप सचिव (सूतगिरणी),(V०००९) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२ यांना “नियंत्रण अधिकारी”म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यानुसार त्यांनी रा.स.वि.म., नवी दिल्ली यांना उपरोक्त रक्कम RTGS द्वारे वितरीत करण्याची कार्यवाही करावी. बँकेचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

| **खात्याचे नाव** | **बँकेचे नाव व शाखा** | **चालू खाते क्रमांक** | **आय.एफ.एस.सी. क्रमांक** |
|---|---|---|---|
| National Cooperative Development Corporation | State Bank of India Commercial Branch, Nehru Place, New Delhi | 32164052874 | SBIN0004298 |

६. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४०४/२०२१, दि. १३.०९.२०२१ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२१०९१४१५००३६२७०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Prasenjeet Karlekar

Digitally signed by Prasenjeet Karlekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-operating Marketing And Textiles Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d219c43caa42a6d2c11a62256b2ff3ad939a420c9fb6fa0cb24c384214bcee8c, cn=Prasenjeet Karlekar
Date: 2021.09.15 13:39:13 +05'30'

**( प्रसेनजीत कारलेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.
२) महालेखापाल, (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.
३) प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहायक, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४) कार्यासन अधिकारी (रोखशाखा) (२प्रतींसह),सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय, मुंबई
५) अवर सचिव,१७-स/कार्यासन अधिकारी,१६-स,सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय,मुंबई ३२
६) वित्त विभाग, कार्यासन व्यय-२ / अर्थसंकल्प-१३, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७) उप निदेशक (वित्त), राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळ, ४- सिरी इन्स्टीटयुशनल एरिया, हौझ खास, नवी दिल्ली - ११० ०१६.
८) आयुक्त वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
९) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१०) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
११) शाखा व्यवस्थापक, स्टेट बँक ऑफ इंडिया, कमर्शिअल ब्रँच, नेहरु प्लेस, नवी दिल्ली.
१२) निवडनस्ती (टेक्स १- ब / टेक्स-१-अ).